मित्रांनो,
आज भारतीय दिनगणनेनुसार पौष कृष्ण पंचमी नेताजी सुभाषचंद्र बोस यांची १२५वी जयंती आहे. त्या निमित्ताने नवी दिल्लीत त्यांच्या होलोग्राम पुतळ्याचे राष्ट्र समर्पण पंतप्रधान नरेंद्र मोदींच्या हस्ते झाले. याची जाण राखून हे ८३ क्रमांकाचे ईपुष्प सादर करत आहे.

# पुस्तक परिचय







# नेताजींचे सहवासात
## भाग १

नेताजींचे सहवासात कॅप्टन पुरुषोत्तम नागेश ओक



# नेताजींचे सहवासात कॅप्टन पुरुषोत्तम नागेश ओक

कै. पुरुषोत्तम. ना. ओकांच्या ४ डिसेंबर (२००७) ला पुण्यतिथी निमित्ताने त्यांच्या पुस्तकांचा परिचय करून देताना त्यांचा चुलत पुतण्या म्हणून अभिमान वाटतो.

कै. काकांनी ह्या पुस्तकांतून त्यांच्या व नेताजींच्या सहवासात घडलेल्या घटना आणि त्यातून नेताजींच्या स्वभावाच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकला आहे. स्वातंत्र्यपुर्व काळातील मराठीबाजाने केलेल्या लिखाणात पुनांच्या वैशिष्ठ्यपूर्ण लेखनपद्धतीचा व शब्दसंचयाचा परिचय मिळतो. त्याचा प्रत्यय म्हणजे पुस्तकाचे शीर्षकः नेताजीं'च्या' ऐवजी त्यानी 'चे' असा प्रत्यय लावला आहे.

पुस्तकात एकंदर १२ प्रकरणे असून शेवटची दोन प्रकरणे २००० सालच्या आवृतिच्या निमित्ताने भर घालून प्रकाशित झाली होती. माझ्या हातात या पुस्तकाची तिसऱ्या आवृत्तिची प्रत ऑक्टोबर २०१३ मधे मिळाली. तेंव्हापासून मिसळपावच्या वाचकांना काकांच्या नेताजींच्या सहवासाचा परिचय सादर करण्यासाठी लेखन करायचे मनात होते. नाडी ग्रंथावरील अभ्यासकार्यात गुंतल्याने सवडीने लिहायला घेऊ असे वाटले. तेवढ्यात कै. काकांची पुण्यतिथी काल असताना लेखन सुरू झाले. वाचकांच्या प्रतिसादाप्रमाणे काही रंजक भाग नंतर सादर करावेत असे वाटून सर्वसामान्यपणे कुतुहलाचा विषय असलेल्या नेताजींच्या गूढ मृत्यु बद्दल त्यांनी लिहिलेल्या भागाने सुरुवात करत आहे.

## नेताजींचा मृत्यू

नेताजींच्या अपघाती मृत्यूच्या संबंधित पुना म्हणतात, ' सुभाषचंद्र बोस त्यांनी निवडलेले सुमारे ६ भारतीय सहकारी १६ ऑगस्ट १९४५ रोजी सकाळी जपानी लष्करी विमानाने बँकॉक नगरी प्रातःकाली येऊन पोचले व लगेच सुमारे २ तासानी म्हणजे ८।। च्या सुमारास सायगांवकडे जाण्यासाठी निघाले. तेथे एक दिवस सर्वांना मुक्काम करावा लागला. कारण, शरणागतीनंतर दूरवर पसरलेल्या स्वतःच्या लष्करी केंद्रांची जपानला आवराआवर करायची होती. त्या घाईघाईच्या निरवानिरवीत विमाने कमी पडत होती. म्हणून जपान्यांनी सुभाषचंद्रांना सांगितले की - " तुम्ही स्वतः व एकच कोणी भारतीय सहकारी अशा दोनच जागा टोकियोला जाणाऱ्या लष्करी विमानात नेता येथील. कारण, बऱ्याच जपानी लष्करी अधिकाऱ्यांनाही त्याच विमानाने टोकियोस जायचे आहे. इतरांनी

तूर्त सायगाँन (सायगांव) येथे मुक्काम करावा. काही दिवसांनी त्यांना विमानाची सोय होताच टोकियोला धाडले जाईल."

म्हणून बरोबर आलेल्यांपैकी सुभाषचंद्रानी कर्नल हबिबुर रहमान (लाल गोलातील)ह्यांची निवड केली....

*हबिबुर रहमान हा शांत, सज्जन व्यक्ति सालस स्वभावाचा होता. नेताजींच्या मृत्यूची हकिकत मला १९४७ साली प्रत्यक्ष त्याचेच तोंडून ऐकायला मिळाली. कारण तोच एक भारतीय त्याच अपघातात सापडून शेवटपर्यंत सुभाषचंद्र यांच्यासह होता.

शनिवार दि. १८ ऑगस्ट १९४५ ह्या दिवशी सकाळी सुभाषचंद्र बोस, हबिबुर रहमान हे काही अन्य जपानी लष्करी अधिकाऱ्यांसह सायगांवहून विमानाने टोकियोला जाण्यास म्हणून निघाले. दुपारी १।।च्या सुमारास विमान टायवान बेटातील टायशेकू विमान तळावर पेट्रोल भरण्यासाठी व काही स्थानिक जपानी लष्करी अधिकाऱ्यांना घेण्यासाठी उतरले.

काही सैनिक उतरवणे, काही नवे चढणे, विमानाच्या टाकीत पेट्रोल भरणे इ. सव्यापसव्य झाल्यावर दुपारी २।। वाजताच्या सुमारास त्या विमानाने आकाशात झेप घेतली. उड्डाणानंतर विमानाने वेग वाढवण्याची पुर्व तयारी म्हणून अधांतरी विमान तळाभोवती एक - दोन चकरा मारल्या, तेवढ्यात विमानाच्या यंत्राचे जे दोन पंखे उभय बाजूस विमानाच्या पुढ्यात वेगाने फिरत होते, त्यापैकी एक गळून धाडकन खाली कोसळला. त्या बरोबर विमानाचा तोल जाऊन गटांगळ्या खात विमान धाडकन भोवतालच्या मैदानावरच कोसळले. विमान फार उंचावर नव्हते. त्याचा वेगही फार नव्हता. तरी आत जे कोणी विमानाच्या पुढल्या भागात वा मागल्या भागात शस्त्रास्त्रे, चिलखती टोप इ. जड साहित्य घेऊन वा काहीही लोखंडी वस्तू न घेता बसलेले होते, त्यानुसार भूमी, विमान व आतील जड सामान ह्यांच्या आढळआपटीच्या चेंधामेंधात दोघे - तिघे जपानी ठार झाले. बाकीच्यांना कमी अधिक दुखापती झाल्या. त्यात हबिबुर रहमान यांस नगण्य मार बसला. सुभाष चंद्रही भूमीवर कोलमडले, पण ज्यांना विशेष दुखापत झाली नव्हती अशा जपान्यांनी व हबिबुर रहमान ह्यांनी सुभाषचंद्रांना हातानी धरून उभे केले, तेंव्हा असे लक्षात आले की, भूमीवर आढळलेल्या विमानाच्या पेट्रोल टाकीने पेट घेतला होता व त्या जळत्या पेट्रोलची एक लाट सुभाष चंद्रांच्या अंगावर फेकली जाऊन त्यांचा घट्ट मिलिटरी पोशाख ओला चिंब झाला होता व त्यातून सुभाषचंद्रांच्या गळ्यापासून पायापर्यंत धूर व वाफा निघत होत्या.

त्यांच्या पायात गुडघ्यापर्यंतचे घोडेस्वारीचे चामडी बूट होते. त्यावर मांड्याशी फुगीर शिवण असलेली गरम हिरव्या कापडाची विजार (Breeches) घातलेली होती. टोकियोत थंडी असणार म्हणून तशाच गरम हिरव्या कपड्याचा बुशशर्ट अंगासरशी कापडी पट्ट्याने पोटावर आवळलेला होता.

अशा त्या घट्ट जाम्यानिम्यावर जळत्या पेट्रोलची एक लाट जोरात भिरकावली गेल्याने सुभाष चंद्रांचे शरीर रताळ्यासारखे भाजून डबून गेले होते. बरोबरचे जे लोक सावरले त्यांनी सुभाष चंद्रांना धरून उभे राहण्यास सहाय्य केले व सुभाष चंद्रांची घट्ट वस्त्रे काढून टाकली.

स्वातंत्र्य लढ्यासाठी गेली दोन वर्षे सभा संमेलनातून भारतीय नरनारींनी जे सोने, रुपे, नाणी, हिरे इत्यादि संपत्तीचा दिली होती व जी शिल्लक होती, ती पुढील अतर्क्य व संकटमय जीवनात सुभाष चंद्रांना उपयोगी पडावी म्हणून एका पेटाऱ्यात बंद करून त्यांचे बरोबर दिली होती. ती सारी संपत्ती विमानाच्या आपटीने पेटारा फुटून विमानतळावर दुपारच्या उन्हात चमचमत विसरून निपचित पडली होती.

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठी स्वतःच्या जिवाचा आटापिटा करणारा हा वीरमणी नेताजी सुभाषचंद्र बोस एखाद्या देवदूतासारखा आकाशातून अवचित अवतरला असा धुराच्या व वाफाऱ्यांच्या वेष्टनात विमानतळावर विखुरलेल्या रत्नांच्या चमचमाटात मधोमध ताठ उभा होता.

अपघात होताच त्या केंद्रावरील जपानी सैनिकांनी धावपळ करून कापडी स्ट्रेचर्स आणून जखमी व्यक्तिंना मोटार गाड्यातून लष्करी इस्पितळात पोहोचवले. सुभाषचंद्रांना बाह्य इजा विशेषशी झालेली नव्हती. कोठे खरचटले असेल तेवढेच. पण त्यांचे अंग मात्र जळत्या पेट्रोलने ओलाचिंब झालेल्या घट्ट लष्करी पोषाखाच्या उबाऱ्याने आतून धुपून उकडल्यासारखे झाले होते.

विमानतळापासून काही अंतरावर असलेल्या जपानी इस्पितळात सुभाष चंद्र व हबिबुर रहमान दोघे पलंगावर एकमेकांपासून पाच - सात फुटाच्या अंतरावर पहुडले होते. हबिबुर रहमान ह्यांच्या मनगटापाशी जळत्या पेट्रोलचे तुरळक थेंब पडल्याने तेथे थोडे भाजल्यासारखे झाले होते. एरव्ही ते सुस्थितीत असल्याने ते नेताजींच्या सुश्रुषेकडे लक्ष देत होते.

अशा प्रकारे ३।। ते रात्री ८।।पर्यंत सुभाषचंद्र बोस हे पलंगावर पडल्या पडल्या "मैं तो ठीक हो जाऊंगा" असे हबिबुर रहमानना म्हणत होते. पण रात्री ८।। नंतर मात्र सुभाषचंद्रांना ग्लानी येऊ लागली. त्यांची शुद्ध हरपू लागली. त्यांचे शब्द अस्पष्ट, असंबद्ध व तुटक उमटू लागले. तशा अवस्थेत ते एकदा हबिबुर रहमान ह्यांना म्हणाले, " मी ह्यापुढे जीवंत राहू शकेन असे वाटत नाही. म्हणून माझ्या देश बांधवांना माझा शेवटचा निरोप

कळवा कि -" बाबांनो, माझ्या जीवात जीव असे पर्यंत मी देशाच्या स्वातंत्र्यासाठी शक्यतो नाना प्रकारची खटपट केली. ते ध्येय साध्य होईपर्यंत अतःपर हिंदी जनतेनेही तो लढा अविरत नेटाने व निश्चयाने चालू ठेवावा. एवढे सांगून नेताजींची शुद्ध हरपली ती कायमचीच. रात्री १०॥च्या सुमारास शनिवार दि. १८ ऑगस्ट १९४५ रोजी (वय सुमारे ४८॥) टायकून बेटावरील टायशेकू येथील जपानी लष्करी इस्पितळात नेताजी सुभाषचंद्र बोस ह्यांचे प्राणोत्क्रमण झाले. दुसऱ्या दिवशी तेथील विद्युत दाहगृहात सुभाषचंद्रांच्या पार्थिव देहास अग्नी देण्यात येऊन त्यांची रक्षा टोकियोतील रिंकोजी मंदिरात ठेवण्यात आली आहे. भारतीयांनी ती नेऊन त्यावर अंत्यसंस्कार करावेत असे जपान्यांचे म्हणणे, पण ती रक्षा सुभाष चंद्रांची कशावरून अशा संशयाने बोस कुटुंबिय रक्षा स्वीकारण्यास उत्सुक नाहीत म्हणून भारत सरकारही ती रक्षा आणण्यास तयार नाही. अशा घोटाळ्यात सुभाषचंद्रांची रक्षा जपानी राजधानीच्या रिंकोजी मंदिरात घोटाळत पडली आहे. जपान्यांच्या सहाय्याने स्वातंत्र्य युद्ध चालवलेल्या सुभाषचंद्रांच्या देहाची राखही जणू काय जपान देशाची भूमी सोडायला तयार नाही.

## <u>बोलाफुलाची गाठ</u>

जपानी सरकारला सुभाष चंद्र बोस शेवटची अशी विनंती करायला जात होते की, त्यांच्या एखाद्या विमानाने रशियाच्या पुर्वेकडील सरहद्दीवर वा सरहद्दीच्या आत जेथे कोठे सोडता येईल तेथे सोडून द्यावे. तेथून पुढे रशियन सत्ता प्रमुख स्टॅलिनकडे जाऊन भारतातील आंग्ल सत्ता उलथून लावण्यास रशिया किंवा अन्य कोणाचे सहाय्य मिळते का ते आजमावण्याचा सुभाषचंद्रांचा विचार होता.

रशियाच्या सरहद्दीवर वा रशियन प्रदेशात कोठेही सुभाषचंद्रांना गुप्तपणे उतरल्यावर इंग्रजांनी सुभाषचंद्रांचा मागे काढण्याचा प्रयत्न करू नये म्हणून सुभाषचंद्र विमान अपघातात दगावल्याची घोषणा करायची असा एक पर्याय सुभाषचंद्रांच्या व जपानी अधिकाऱ्यांच्या विचाराधीन होता. म्हणून २१ ऑगस्ट १९४५ रोजी जेंव्हा टोकियो रेडियोवरून सुभाष चंद्रबोस विमान अपघातात वारल्याची बातमी प्रसृत करण्यात आली, तेंव्हा बऱ्याच जणांना ती राजकारणी थाप वाटली, पण दुर्दैवाने ती बातमी खरी ठरून जपानला पोचण्यापुर्वीच सुभाषचंद्रांचा अंत झाला. जणू काय त्यांच्या एकाग्र धाडसी जीवनाचा नियतीनेच पूर्ण विराम दिल्याने एकूण बोलाफुलाची गाठ पडली!

लेखक - एक्स - कॅप्टन पी. एन. ओक

**ताजा कलम –**

1. *फाळणी नंतर हबिबुर रहमान पाकिस्तानात स्थलांतरित झाले. १९७८मधे वारले.

2. नेताजींच्या मृत्यूचे गूढ शोधायला अनेक समित्या स्थापल्या गेल्या. त्याचा तपशील इथे



## पुस्तक परिचय - नेताजींचे सहवासात भाग २

### पुस्तकाची प्रस्तावना -

... पु. ना. ओकांच्या नेताजींचे सहवासात पुस्तकाचा मुकुटमणी आहे प्रकरण १० हे. त्यात बाबत प्रस्तावनेत तिखट उल्लेख आहे.

'इसापनीती, पंचतंत्र अथवा हितोपदेश इत्यादि ग्रंथ जसे काऊ-चिऊच्या गोष्टी सांगण्याच्या उद्देशाने लिहिलेले नाहीत तद्वत प्रस्तूत ग्रंथही केवळ मनोरंजनासाठी लिहिलेला नाही. त्याच प्रमाणे "सुभाष लीलामृत" अथवा "सुभाष महात्म्य" या दृष्टीने प्रस्तूत ग्रंथाकडे पाहणे चुकीचे ठरेल...

...लेखक व वाचकांचा (स्वातंत्र्यपुर्व काळातील - कंस माझा) आपल्या समाजातील अन्योन्य संबंध कसा आहे, यावर ते म्हणतात, 'वाचकांच्या आवडीनिवडी भिन्न असतात. सर्वांचे समाधान करू पाहणाऱ्या लेखकाची स्थिती इसापनीतील गोष्टीप्रमाणे गाढव विकावयास नेणाऱ्या म्हाताऱ्यासारखी व्हायची! गिऱ्हाईकांच्या चटावलेल्या जिभेस भजी, भेळ, उसळ, मिसळ, सरमिसळ इत्यादि चटकदार परंतु अंती घातुक असे पदार्थ पुरविणारा वाङ्मयीन उपहारगृहातील एका गरीब व गलिच्छ हुकुमी 'पोऱ्या' हीच सामान्य वाचकवर्गाची सर्वसाधारण लेखकासंबंधी रूढ असलेली कल्पना सूक्ष्म मनोविश्लेषणांती दिसून येते. शाब्दिक अथवा अलंकारिक सर्कस करून लोकांची शाबासकी मिळवणे किंवा चव्हाट्यावर साहित्यिक तमाशा करून पैसे मिळवणे हे मुळात लिखाणाचे ध्येय असता उपयोगी नाही. वाचकांस संतुष्ट ठेवणे यात लेखकाचे कसब आहेच यात शंका नाही, परंतु लेखक हा पौष्टिक वाङ्मय निर्माण करून समाजास पुष्ट बनवणारा साहित्यिक बल्लवाचार्य असला पाहिजे. काही एका क्षेत्रात तरी स्वतंत्र विचार असणे, ते स्पष्टपणे प्रकट करण्याची हातोटी साधणे व निर्भयपणे सांगण्याची तयारी ठेवणे हे नामवंत लेखकांचे व वक्त्यांचे विशेष गुण असतात. समाजाच्या विचारास काहीएक प्रकारची कलाटणी मिळावी हाच कोणत्याही ध्येयनिष्ठ लिखाणाचा उद्देश असतो. लघुकथांप्रमाणे नेताजींचे सहवासातील आठवणी सांगितलेल्या नाहीत. 10व्या प्रकरणात या ध्येयाचा

कळस झाला आहे. (काहींच्या मते हे प्रकरण अस्थानी वाटते अशा मतांचा समाचार घेताना ते म्हणतात), - हा कळसच काढून टाकला असता, तर प्रस्तूत लेखकाच्या दृष्टीने तरी (तो ग्रंथ) उघडा - बोडका व पडीक दिसला असता....

... या ग्रंथाच्या उद्देशावरील भाष्यावरून त्यांना अभिप्रेत नेताजींच्या व्यक्तिमत्वाचे विविध पैलू व त्यांच्या पर्वाची माहिती देऊन थांबायचे नाही. तर 'वाचकांना स्वतः तसे निगर्वी, निस्वार्थी, त्यागी, सेवाभावी, तेजस्वी, वीरवृत्तीचे जीवन जगण्याची प्रेरणा, स्फूर्ती व मार्गदर्शन लाभावे हा मूळ उद्देश आहे.'

## नेताजींचे प्रथम दर्शन व भेट

... ते म्हणतात, 'नेताजींना सिंगापूरच्या आधी मी एकदाच पाहिले होते, ते हिंदुस्तानात. इसवी सन 1939साली कॉंग्रेसचे अध्यक्षपदाचा राजिनामा देऊन ते पुरोगामी गटाचा प्रचार करण्यासाठी पुण्यात आले होते. श्रोत्यांच्या अफाट गर्दीत मी त्यांना लांबून पाहिले. त्याप्रसंगी माझा निकटचा सहवास कधी होईल असे वाटण्याचे काहीच कारण नव्हते. त्यांचे भाषणाने मी भारावून मात्र गेलो व आत्ताच त्यांचे पक्षास जाऊन मिळावे निदान त्यांच्या पक्षाच्या मुखपत्रात तरी आपण काम करावे असे तरुणपणीच्या सहजप्रवृत्तीने वाटून गेले. देशभक्तीच्या वासंतिक वातावरणात विचार वृक्षांना फुटलेले तरुणपणचे पल्लव हे आजूबाजूच्या परिस्थितीच्या शरदऋतूत ताबडतोब झडून जातात, तसेच ते व्याख्यान ऐकून टिळक स्मारक मदिराच्या आवाराबाहेर मी पडलो तेंव्हा झाले...

... भविष्याच्या उदरात अतिपुर्वेत सुभाषचंद्र बोस हे प्रकट व्हायचे होते. विधीने त्यांची तयारी चालवली होती. काळाचा महिमा अगाध आहे, असे म्हणावे लागते. कृष्ण जन्माबरोबरच कृष्णाचे सवंगडी ही विधात्याने आपल्या मायावी लीलेने एकत्र केले, तद्वत नेताजी सुभाष यांचे अवतारकार्यास ज्यांचा हातभार वा बोटभर लागावयाचा होता त्या व्यक्ती अव्यक्त अशा लाग्याबांध्यांनी त्या दिशेने ओढल्या जाऊ लागल्या. माझेही काहीसे असेच झाले. हाही एक अपूर्व योगायोगच म्हणावयाचा....

...स्वातंत्र्याचे वातावरण व नेताजींसारखा गुरू मागूनही कोणास मिळणार नाही. सुदैवाने मला हा लाभ झाला. अतिपुर्वेत नेताजी यांचे निकट सहवासात असणाऱ्या व्यक्तीत महाराष्ट्रीय असे आम्ही दोघेच होतो. एक मी व दुसरे जगन्नाथराव भोसले. नेताजी बोस हे ३ जुलै १९४३ रोजी अतिपुर्वेत अद्भुत रितीने प्रगट झाले व १८ ऑगस्ट १९४५ तितकेच अदभूत पणे लुप्त झाले. दोन वर्षे व दीडमहिन्याच्या काळात मला त्याचा दैनंदिन असा पुष्कळ असा सहवास लाभला...

...सिंगापुरात जपान्यांच्या हाती सापडलेल्या साठ हजार हिंदी युद्धबंद्यापैकी १८ ।। हजार हिंदी स्वातंत्र्य सैनिक बनले. त्यांचे अधिपत्य (पूर्वाश्रमीचे कॅप्टन) जनरल मोहन सिंह यांचे होते. जपान्यांचा व त्यांचा बेबनाव होऊन डिसे. १९४२चे सुमारास त्यांना स्थानबद्ध केले. तत्पुर्वी २-३ महिने सामिल झालेले लेफ्टनंट कर्नल जगन्नाथराव भोसले यांनी जपान्यांच्या विनंतीवरून जर्मनीतून सुभाषचंद्र अतिपुर्वेत येईपर्यंत स्वातंत्र्य चळवळीची धुरा धारण केली....

... त्यांचे विश्वासू व कार्यप्रवीण अशा सुविद्य मदतनिसाची वाण भासू लागली. त्यादृष्टीने त्यांच्या परिचयातील अधिकाऱ्यांशी त्यांनी तपास सुरू केला. सर्वांनी एकमुखाने माझे नाव व माझ्याबद्दलची माहिती कानी घातली. असा रीतीने पूर्वपरिचय किंवा तोंडओळखही नसताना त्यांनी विमानाने एक अधिकारी सायगाव शहरी पाठवला. मला त्या अधिकाऱ्याने सांगितले, ‘असे असे काम आहे, हे काम अंगावर घेण्याची तयारी असल्यास पहा’. काही काळ विचार केल्यावर मला ही या कार्याचा अंगिकार करण्याची बुद्धी झाली. मी रुकार दिला आणि ताबडतोब सिंगापुरास गेलो. इ.स. १९४३ च्या जून महिन्याचे ६ तारखेस मी सिंगापुरात पोहोचलो. येथपर्यंत मला पुढील महत्वपुर्ण घटनांची काहीच कल्पना नव्हती. सिंगापुरातील आझाद हिंद नामक इंग्रजी दैनिकाच्या १४जून १९४३ च्या अंकात सुभाषचंद्र यांच्या अतिपुर्वेतील आगमनाची आनंददायक वार्ता मी वाचली. ते टोकियोत असल्याचे वृत्त त्यात जाहीर करण्यात आले होते. ते कसे आले केंव्हा आले काही उल्लेख त्यात नव्हता. युद्धकालातील अतिमहत्वाचे गौप्य म्हणून तत्संबंधी व्यक्तींनी तो सर्व वृत्तांत अत्यंत कसोशीने जतन करून ठेवला होता. ...

## नेताजी हे पुर्वपद

... सुभाषचंद्र बोस हे नाव लांबलचक तर खरेच, परंतु त्यात आणखी एक विशेष गोष्ट अशी की, ‘श्री’ अथवा तत्सम इतर कोणते तरी पुर्वपद किंवा बहुमानार्थी ‘बाबू’ सारखे उत्तरपद त्यास लावणे जरूर होते. इतकेही करून शिपाई अथवा तत्सम कनिष्ठ लोकांचे तोंडी ते एकेरी असे वाटायचे. एखाद्या निकटवर्तीयाचा जिव्हाळा व राष्ट्रपतीचा निदर्शन असा बहुमान अशा दोन्ही गोष्टी एकाच नावा साधणे सोपी गोष्ट नव्हती. हे व असा तऱ्हेचे उद्देश‘नेता’ या शब्दाचे ‘नेताजी’ या रूपाने साधले.

मिसळपाव.कॉम

भाग २समाप्त...

...

भाग ३ (अ) -

**नेताजी निवास**

सिंगापूर बेटाच्या पूर्व किनाऱ्यावर समुद्रकाठी एकएका धनिकांचे ऐसपैस बंगले आहेत. त्या विभागास 'कातोंग' म्हणतात. स्थानिक लोकांच्या धनाने, श्रमाने बांधलेल्या या इमारतीत पाश्चात्यांची चैनबाजी चालत असे. अतिपूर्व युद्धाची वावटळ सुरू होऊन इंग्रजांचे राज्य छत्र  लागल्या बरोबर ऐषआराम करणारे युरोपियन, अमेरिकन, ज्यू, अरब, चिनी इत्यादि अठरापगड जातींचे लोक दाही दिशांना पांगले, त्यांच्या मिळकतीचे तीन तेरा वाजले. तेंव्हा त्याची मिऴकत ही शत्रूचीच मिळकत असे समजून आंतरराष्ट्रीय व्यवहारास अनुसरून जपान्यांनी ती ताब्यात घेतली. अशाच पैकी 'मेयर' नामक एका यःपलाय केलेल्या ज्यू कोट्याधीशाचा एक महाल आहे. सिंगापुरातील खाजगी इमारतीत पाहू जाता हाच महाल उत्तम होता. तेथील जपानी कारभाऱ्यांनी नेताजींचे सिंगापुरातील निवास म्हणून ही हवेली हिन्दी स्वातंत्र्य संघाच्या हवाली केली. या भवनच्या आवाराचे समोरील बाजूस दोन पुरुष उंचीचा एक निळसर खडबडीत कोट आहे. कोटाचे दोन्ही टोकास दोन जड लोखंडी फाटके आहेत. एका स्वातंत्र्य सैनिकाचा तेथे बळी पडला होता. दोन्ही फाटकापाशी एक एक बंदूकधारी पहारेकरी असे. पलिकडे पहाऱ्याची चौकी असून तेथे आठ सशस्त्र पहारेकरी नेहमी तयार बसलेले असत. या दोन्ही रस्त्यांच्या मधोमध बाग असून निर्गमन फाटकापाशी ही दुसरा लहानसा सेवक निवास आहे.

बंगल्याच्या मजबूत सागवानी पिंगलवर्णी प्रवेशद्वारातून आत शिरताच वरील बाजूस जाड काचेचा एक घुमट आहे. यावर अनेक रंगांची वेलबुट्टी असून त्यातून मंद प्रकाश आत येतो. दोन्ही बाजूंनी दोन वक्राकृती संगमरवरी सोपान प्रवेश द्वाराच्या माथ्यावर युति पावून पुढे एका विस्तीर्ण निश्रेणीच्या रुपाने दुसऱ्या मजल्याच्या चरणी लीन होतात. तेथे नंगी तलवार हातात धरलेला स्वातंत्र-सैन्याचा एक पहरेकरी सतत पहाऱ्यावर उभा राही.

समुद्रकाठास समांतर अशी ७ फूट रुंदीच्या लालदगडांची लांबलचक फरसबंदी केलेली असून त्यास सीमेंटच्या नक्षीदार खांबांचा ३ फूच उंचीचा कठडा आहे. मधोमध तीन पायऱ्या केलेल्या असून त्यायोगे क्षीरसागरात बुडवून पाय शीतल करता येतात. समुद्रकाठच्या लाल फरसबंदीवर एक बंदूकधारी स्वातंत्र्य सैनिक येरझाऱ्या घालीत अफाट सागराचा व अनंत आकाशाचा ठाव घेण्याचा प्रयत्न करी असे. न जाणो, या बाजूने कोणी राहू, केतू आमच्या चंद्र नेत्यास ग्रासण्यास यायचा!

समुद्रकाठच्या या पिछाडीच्या आवारात हिरवळीचे मैदान असून त्यात दोन टेनिस कोर्ट्स होती. एकूण सुमारे दोन वर्षाच्या अतिपुर्वेतील वास्तव्यात नेताजी, या ठिकाणी आठ-दहा वेळा टेनिस खेळले असतील नसतील. कोणत्याही मैदानी व मर्दानी खेळाविषयी नेताजींस आवड आहे. परंतु खेळाकडे लक्ष देण्यास त्यांस स्वातंत्र्य कार्यातून क्वचितच

फुरसत मिळत असे. याच आवारात एका बाजूस जमिनीखाली एक वर्तुळाकार भुयार खणून त्यात लाकडी चौकट बसवून एक दोन खुर्च्या ठेवण्यात आलेल्या होत्या. लाकडी छतावर एक लघुतम टेकडी वजा मातीचा ढीग करून त्यावर हिरवेगार गवत उगविलेले होते. भूपृष्ठाच्या व लाकडी मधोमध  हवा आणि  आत येण्याकरिता दुसऱ्या मजल्यावर सर्वत्र  रंगाचे लाकडी तळ होते.  असून त्याची  एकंदरीत भर आला होता. त्या ठिकाणी एक होता त्याच्या उजव्या बाजूला नेताजींचे  व डाव्या बाजूला  वाचन, लेखन, अभ्यास, व काम करीत त्यांना सागरचे आणि अनंत आकाशाचे आल्हाददायक दर्शन घडत असे. सृष्टी देवतेच्या निळसर अंगवस्त्राचे सिंधुजलरूपी सळसळणारे ते घोळ व वर आकाशाचा तो पदर यामुळे आपण एकाद्या मंदिराच्या शांत आणि पवित्र वातावरणात उभे असल्याचा भास होई. वादळाचे वेळी या बाजूने वारा आणि जलतुषार आत शिरू नयेत म्हणून वरचे बाजूस चिकाच्या पड्यांच्या गुंडाळ्या टांगल्या असत. दूरवर एखाद दुसरे जहाज नांगरून ठेवलेले दिसे. नेताजी-निवासात जसे राजकारणाचे रंग बदलत असत तद्वत नभातही कधी स्वच्छ सूर्यप्रकाशाचा आनंद तर कधी मेघ छायेची उदासीनता दग्गोचर होई.

वरचे मजल्यावर दोहो बाजूस दोन प्रशस्त खोल्या होत्या. त्यात नेताजींचे सानिध्य असणाऱ्या स्वातंत्र्य सैनिकांच्या अधिकाऱ्यांपैकी दोघे राहात असत. खालचे बाजूस मधोमध असलेल्या लांब शोभिवंत दालनाच्या दोहो बाजूला दोन खोल्या होत्या. डावे बाजूची खोली ही भोजनगृह होते. भोजनगृहाला लागून असलेल्या दोन खोल्यापैकी लागून होती तीत कोठार होते. या कोठारगृहास शेपटी वजा एक तिरपा बोळ जोडला असून या बोळाचे शेवटी स्वयंपाकगृह जोडलेले होते. स्वयंपाक गृह दूर ठेवण्याचे कारण म्हणजे पाकनिष्पत्तीचा वास व धूर यांचे पासून लक्ष्मीपती गृहस्वामीस कपाळशूळ होऊ नये.

ह्या भोजनगृहाचे तळ लाकडी असून त्यावर मधोमध सुंदर पातळ गालिचा पसरलेला होता. गालिच्यावर दोहो बाजूस चार चार खुर्च्या ठेवलेल्या असून त्यांचे मधोमध एक मेज ठेवलेले होते. मेजाचे अरुंद बाजूस एक एक खुर्ची ठेवलेली होती. खुर्च्यांची आसने व पाठी गुलाबी मखमलीची गाद्दीच्या होत्या. खुर्चांवरील कलाकुसर विशेष गुंतागुंतीची नसली तरी त्यांच्या वाटणीवरून त्या कोठल्यातरी राजप्रसादातील असाव्यात असे वाटे. भिंतीवरचे बाजू छताजवळ असलेल्या खांचात मंद प्रकाश प्रसृत करणाऱ्या विजेच्या लांब काचेच्या नळ्या लावलेल्या आहेत. मधोमध असलेल्या भोजन-मेजावर खुर्चीच्या समोर सुबक नक्षीदार चांदीचे काटे चमचे, सुऱ्या व सोनेरी वेलबुट्टी काढलेल्या चिनीमातीच्या लहान-मोठ्या ताटल्या ठेवलेल्या असत. प्रत्येक थाळी जवळ घडी केलेला स्वच्छ रूमाल असे. प्रवेशद्वारातून शिरताच मेजाचे अरुंद बाजूस मधोमध जी एकुलती एक खुर्ची असे ती त्यांची. तेथेच नेताजी नेहमी भोजनाला बसत.

खालच्या प्रमुख दालनाच्या व द्वार प्रकोष्ठाच्या दोहोबाजूस ज्या खोल्या आहेत त्यातही नेताजींचे सन्निध असलेले लष्करी अधिकारी राहत. नेताजींचे शयनगृह सोडले तर या इतर अवती भोवतीच्या खोल्यातून दोन अथवा तीन पलंग, मेज, आरशाची कपाटे असा तऱ्हेचा शोभिवंत संभार होता. प्रत्येक खोलीच्या आतले बाजूस पाश्चात्य पद्धतीचे एक एक स्वतंत्र स्नानगृह व शौचकूप होते. त्यातील पांढरी स्वच्छ फरशी व रुपेरी मुलामा चढवलेल्या चकाकणाऱ्या दांड्या, खुंट्या इत्यादि पाहिले म्हणजे मन प्रसन्न होई. खालील प्रमुख दालनाच्या डाव्या कोपऱ्यात एक टेलिफोन असून त्याचा तार संबंध नेताजींच्या खलबतखान्यातील टेलिफोनशी असे. समदर्जाच्या कोणी व्यक्तिस खुद्द नेताजींशी टेलिफोनचे सहाय्याने संभाषण करायचे असल्यास खालचे टेलिफोनपाशी बसलेला ग्रहस्थ वरचे टेलिफोनशी तेथे तार संबंध जोडून देत असे. वर घंटा वाजली म्हणजे नेताजीस तेथूनचे बोलणे सोईचे होई. त्यांस उगाच खाली हेलपाटा घालावा लागत नसे. असे प्रसंग पण क्वचित येत. कारण प्रत्यक्ष त्यांच्याशी संभाषण करणाऱ्या तोलाच्या व्यक्ती मोजक्या असत. त्या व्यक्ती म्हणजे, आझाद हिंद सरकारचे मंत्री, नाही तर जपानी राष्ट्राचे प्रतिनिधी, वकील, खास दूत, सरसेनापती वगैरे. या व्यक्ती सुद्धा दूरवर कोठेतरी काही महत्वाच्या कामात गुंतल्या असून त्यांस ताबडतोब तेथल्या तेथे एखाद्या निकडीच्या मुद्ध्यावर नेताजींचे मत हवे असेल तरच त्यास तेथून टेलिफोनच्या सहाय्याने नेताजींशी बोलण्याचा प्रसंग येई. इतर कामे नेताजींच्या चिटणीसाकरवीच होत. प्रत्यक्ष मुलाखत जर ठरवायची वेळ आली तरी त्याच्या मध्यस्थीनेच. असा रीतीने नेताजीस प्रत्यक्ष टेलिफोन वर फार वेळ बोलावे न लागणे हे त्यांच्या उच्च हुद्यास, मानास, ध्येयास व कार्यास शोभेसेच होते. त्यांचे विषयी सर्वांचे मनात वसत असलेल्या अत्यादराचे ते निदर्शक होते.

भाग ३अ समाप्त....

**भाग ३ (आ) - <u>सिंगापूर वास्तव्यातील निवासातील नोकरवर्ग</u>**

बर्लिनहून नेताजींबरोबर आलेले श्री स्वामी व हसन सुमारे दीड वर्षापर्यंत नेताजींचे चिटणीस म्हणून काम पहात. शिवाय स्वातंत्र्य सैनिकातून श्री रावत हे गढवाली ग्रहस्थ लष्करी सहायक म्हणून दिमतीस दिलेले होते. एक शीख ग्रहस्थ श्री समशेरसिंग व एक चाळीशी उलटलेले गुरखा सुभेदार, नेताजींचे अंगरक्षक म्हणून काम करीत. जपानी भाषा व अथवा व्यक्तींशी संबंध आणणारी सर्व कामे सुलभतेने व्हावीत म्हणून एका उच्च सरदार कुळातील श्री कोबायाशी हे जपानी तरुण नेताजींच्या दिमती हजर असत. श्री. भास्करन हे मलबारी ग्रहस्थ हे नेताजींचे लघुलेखक व टंकलेखक म्हणून काम पहात. डॉ. राजू हे हे नेताजींचे वैयक्तिक वैद्यकीय सल्लागार होते. रोज रात्रौ हिन्दी स्वातंत्र्य संघातील दोघे

लघुलेखक नेताजींचे निवास जाऊन लंडन सॅनफ्रान्सिस्कोला, दिल्ली इत्यादी शत्रूचे नभोवाणी केंद्रावरून घोषित करण्यात येणाऱ्या सर्व वृत्त रेडिओचे सहाय्याने ऐकून भराभर लघुलिपित टिपून मग त्याचे नेहमीच्या लिपीत भाषांतर करून रात्री २-३ वाजेच्या सुमारास नेताजींसमोर ठेवीत.

रिपु प्रचाराचे विश्लेषण करून त्याचे शोषण करण्याच्या उद्देशाने त्याविरुद्ध प्रचारशास्त्राचे अनुरोधाने कोणते अमोघ अस्त्र सोडावे याचा मनाशी विचार करून नेताजी ते मुद्दे टिपून ठेवीत. नंतर काही महत्वाच्या कागदपत्रांचे वाचन, पत्रलेखन, मनन, दैनंदिनी लिहिणे, पुस्तके वाचणे वगैरे कार्यक्रमात ते मग्न असताना पहाटे पाच अथवा सहाचा ठोका पडे. सर्वसाधारणपणे पाच ते सकाळी नऊ वाजे पर्यंत त्यांची झोपची वेळ असे. त्यांचे निवासस्थानी सतत राहणारे इतर नोकर म्हणजे एक देवी सिंग नावाचा गढवाली शिपाई त्यांच्या दिमती असे. तो कपडे धुणे, धोब्यास देणे, जोड्यास पॉलिश करणे, पितळी बिल्ले चकचकीत ठेवणे, जामनिमा चढवण्यास मदत करणे, इत्यादि कामे त्याच्याकडे असत.

प्रमुख स्त्री-पुरुष कार्यकर्त्यांच्या चालचलणुकीबाबत त्यांचे कानावर काही निश्चयात्मक बातम्या गेल्यावर तेंव्हा त्यास नेताजींनी चांगले खडसावल्याचे ऐकिवात आहे. नेताजी फार क्वचित रागवत. त्यांचा स्वभाव उदार व किंवा चिडखोर नसून सरळ, शुद्ध, आनंदी, समाधानी आणि कर्तव्यदक्ष असे. काम न झाल्याबद्दल त्यास राग येत असे. कारण प्रसंगी ते रागावले तरी त्यांचा संताप हा सात्विक संताप असे. स्वातंत्र्य सैनिकातील एक मराठा मल्ल नेताजींचे अंगमर्दन करण्याच्या कामावर त्यांचे निवासस्थानीच राही. रात्री निजताना व अंघोळ करण्याअगोदर ते दोन वेळा अंगमर्दन करून घेत.

जर्मनीहून नेताजी सिंगापूरला आल्यावर त्यांचे निवासस्थानी जाण्याचे प्रसंग मला वारंवार येत. एके दिवशी सकाळी काही कामानिमित्त दहा वाजायच्या सुमारास मी गेलो होतो. खालच्या दिवाणखान्यात बसून चौकशी करता कळले की सिंगापूर शहरातील एक दोन डॉक्टर व श्री. राजू नेताजींचे रक्त तपासण्यात गुंतले असून नेताजींची प्रकृती नादुरुस्त होती. ते दिवशी हिन्दी स्वातंत्र्य संघाचे व व सैन्य कचेरीत जाण्यास नेताजीस एक तास काय तो उशीर झाला असेल नसेल. ते आजारी आहेत हे कोणास कळलेही नाही. कार्याची तळमळ ही जिवाच्या तळमळीला गिळून टाकण्यास समर्थ असते याचे ते प्रत्यक्ष उदाहरण होते. एरव्ही शरीर व्याधींपुढे सर्व मानव आपापला ध्येयवाद विसरून जाऊन हात टेकतात.

बरेच वर्षापासून मलायातच स्थायिक झालेले श्री सुरीन बोस हे कुटुंबवत्सल ग्रहस्थ नेताजींचे सिंगापुरातील गृहव्यवस्थापक होते. त्यांचे त्यावेळी वय चाळीशीच्या आतबाहेर असून ते अतिशय मनमिळाऊ, गरीब स्वभावाचे होते व हसतमुख चेहऱ्याचे होते. त्यांची पत्नी व मुले ही भाड्याच्या घरी राहत. ते स्वतः सकाळी साडे आठ वाजेपासून रात्री अकरा-

बारा पर्यंत नेताजींच्या बंगल्यावर असत. बंगल्यातील टेबलक्लॉथ, चादरी उशांच्या खोळी धोब्यास देऊन त्याचा हिशोब ठेवणे, दूधवाल्याकडून प्रसंगी कमीजास्त दूध घेणे, भाजीपाला, धान्ये, मसाले, इत्यदि मालाचा साठा पुरेसा आहे किंवा नाही यावर देखरेख ठेऊन जरूर तो स्वयंपाक रोज करवून घेणे, पाहुणे मंडळी जास्त येणार असल्यास अथवा तत्सम विशेष प्रसंगी इतर ठिकाणाहून बैठक, कपबशा, पेले, ताटल्या, काटे, चमचे, सुऱ्या, काचेचे सामान वगैरे मागवून काम झाल्यावर ते पोचवून देणे, नेताजींचे भोजनसमयी काही कमी जास्त असल्यास जातीने पहाणे, आल्या-गेल्यास चहा, कॉफी, दूध, सरबत, मिळण्याची व्यवस्था करणे, घरातील सर्व मंडळी व इतर पाहुणे मंडळी जेवली की नाही? त्यास काय हवे नको इत्यादि बघण्याचा अत्यंत जोखमीचे व कधी न संपणारे असे हे काम होते. तरी जीव टेकीला आल्याचे ते चुकून सुद्धा म्हणाले नाहीत व त्यांचे कामात नेताजीं न्यून काढल्याचे मला तरी माहित नाही!

नेताजींचे मोटारीचा चालक, त्याच बंगल्यावर इतर कामासाठी राहणाऱ्या तीन मोटारींचे चालक व तातडीने संदेश मोटर-सायकलीवरून पोहोचवणारा एक दूत, इतकी इतर मंडळी नेताजींचे निवासस्थानी कायमची असत.

...

## सुभाषचंद्रांची ध्येयनिष्ठ स्थितप्रज्ञता

धकाधकीच्या जीवनात सुभाषचंद्र बोस यांचा अचानक अंत या अंतर्मनाची विशिष्ट ठेवण बहुतेकांना अज्ञात राहिली. त्यांच्या जीवनाची अंतिम मी त्यांच्या निकट सहकारी होतो. शिवाय सन १९३८ च्या सुमारास ते काँग्रेसचे और निवडून आल्यावरही महात्मा गांधींच्या विरोधामुळे सुभाषचंद्रांना अध्यक्षपदाचा राजीनामा द्यावा लागला, तरी सुभाषचंद्रांनी ती गोष्ट मुळीच मनावर घेतली नाही. दस असता तर त्याने महात्मा गांधींशी वैर धरले असते, पण हिंदुस्थानाचे स्वातंत्र्य हा एकमेव ध्येयाशी सुभाषचंद्रांचे मन इतके निगडित झाले होते की, त्यांच्या मनात वैयक्तिक हेवादाव्याचा विचारही शिवत नसे. ह्याचा पुरावा असा की, सन १९४३ ते १९४५ सुभाषचंद्र बोस सिंगापुर, बँकॉक आदि नभोवाणी केंद्रांवरून स्वातंत्र्य युद्धासंबंधी जी जी भाषणे करीत ती राष्ट्रपिता महात्मा गांधींना नम्रपणे अभिवादन करून आरंभ करीत.

तसेच, हिंदुस्थानातील गांधीप्रणित स्वातंत्र्यचळवळीत सामान्यजन असे समजत की, जवाहरलाल नेहरू व सुभाषचंद्र बोस यांच्यात चुरस असून स्वातंत्र्यप्राप्तीनंतर दोघांपैकी मुख्यमंत्री कोणी व्हायचे ह्याबद्दल वितुष्ट माजेल.

पण सुभाषचंद्रांचे मन फार थोर होते. ऐहिक आयुष्यातील सुखोपभोग ईर्षा, वैमनस्य, चुरस, हव्यास, स्वार्थ ह्या सामान्य भावनांना त्यांच्या मनात मुळीच स्थान नसे. कारण,

संन्यस्त वृत्ती ही त्यांच्या मानसाची मूळ बैठक होती. म्हणून वयाचे सुमार १८ व्या वर्षी ते भगवी वस्त्रे परिधान करून हिमालयात फेरफटका करून आले होते पण त्यांच्या चौकस अध्यात्मिक वृत्तीचे समाधान करू शकेल असा गुरू त्यांना का भेटला नाही म्हणून ते नाईलाजाने परत आले. तरी त्यांच्या मनाची अध्यात्मिक कायम राहिली.

मात्र, संन्यस्त वृत्तीने अध्यात्मिक मार्गास लागण्यापूर्वी आपले एक आद्य कर्तव्य पूर्ण केले पाहिजे, अशी एक टोचणी त्यांच्या मनात होती. एका परतंत्र देशात आपला जन्म झालेला आहे. तो सोडवल्याशिवाय जर आप एवढेच नव्हे तर आशय आहे. आपल्या कोट्यवधी बांधवांना पारतंत्र्याच्या शृंखलातून जर आपण 'हरि हरि' करत राह्यलो, तर ती कर्तव्यच्युती होईल तर आद्य कर्तव्य डावलून आपण वैयक्तिक मोक्षाचा स्वार्थी मार्ग स्वीकारला मनात राहून शांतीही लाभणार नाही व मुक्तीही मिळणार नाही, अशी सुभाषचंद्रांची स्वकर्तव्यासंबंधीची विचारसरणी होती. देशमुक्ती हे ते स्वतःच्या मुक्तीची आद्य पायरी समजत असत. त्यापलीकडे कोणतेच उद्दिष्ट त्यांच्या मनात नव्हते.

सिंगापुर आदि नगरी त्यांच्या सार्वजनिक भाषणातून सुभाषचंद्रांनी त्यांची ती दोन (आद्य व अंतिम) उद्दिष्टे अनेक प्रसंगी प्रकट केली होती. एकदा ते म्हणाले होते की. "सांप्रतच्या युद्धातून हिंदुस्थानाला जर स्वातंत्र्य मिळाले, तर ते मी जनतेला सोपवून सुखासमाधानाने माझ्या अध्यात्मसाधनेस्तव निघून जाईन." एकूण जीवनातील सामान्य सुखोपभोगाकडे सुभाषचंद्रांचा मुळीच ओढा नव्हता.

आधुनिक काळी काय किंवा भूतकाळी काय सामान्य जीवनाकडे संपूर्ण दुर्लक्ष करून देशस्वातंत्र्य हे आद्य कर्तव्य व तदनंतर अध्यात्मिक साधना हे अंतिम कर्तव्य मानणारा सुभाषचंद्रांसारखा अन्य कोणी वीर, लढाऊ नेता भारताच्याच नव्हे, तर जगाच्या इतिहासातही सापडणे कठीण.

त्या दोन उद्दिष्टांपासून आपण चळू नये म्हणून सुभाषचंद्र बोस रोज भगवद्गीता वाचीत. कारण अर्जुनासारखीच त्यांच्या मनाची द्विधा वृत्ती होई. कधी वाटे की देशस्वातंत्र्याचे भौतिक उद्दिष्ट सोडून सरळ अध्यात्माकडेच वळावे. पण, त्यांचे दुसरे मन म्हणे की, देशबांधवांस पारतंत्र्यात तडफडत सोडून स्वमुक्तीसाठी स्वातंत्र्यलढ्यातून अंग काढून घेणे वा स्वातंत्र्यध्येयाकडे दुर्लक्ष करणे, ही अक्षम्य कर्तव्यच्युती होईल.

महाभारतीय युद्धात अर्जुनाच्या मनाची सुरवातीस तशीच द्विधा अवस्था होती. एकदा त्यास वाटायचे की, गुरुजन, स्वबांधव व अन्य सैनिक ह्यांची युद्धात हत्या करण्यापेक्षा युद्धभूमी सोडून निघून जावे. तशा त्या द्विधा अवस्थेतून श्रीकृष्णाच्या उपदेशामुळे युद्धास प्राप्त कर्तव्य समजून त्याची पूर्ती करणे आपले आद्य कर्तव्य आहे हा जसा अर्जुनाचा निग्रह झाला तसाच स्वातंत्र्यप्राप्तीचे आद्य कर्तव्य आपल्या हातून पार पडावे ह्यासाठी सुभाषचंद्र बोस हे स्वतःस अर्जुनाच्या भूमिकेत करपून भगवद्गीतेतील श्रीकृष्णाच्या उपदेशामृताचे

चिंतन-मनन करीत. हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्यासाठी शेंडी तुटो वा पारंबी तुटो अशा वृत्तीने विविध प्रकारचे साहसी प्रयत्न अविरत करीत राह्यले. त्यात त्यांचा स्वार्थी अहंभाव यत्किंचितही नसल्याने त्यांना कोणाबद्दलही असूया अशी कधीही वाटली नाही. म्हणून अन्य काँग्रेसी नेत्यांना वा अनुयायांना जशी गाजावाज वाहवा, संपत्ती, अधिकार इत्यादींची अभिलाषा असे तशी सुभाषचंद्रांना मुळीच नव्हती.

सामान्यजन गीतापठण करतात ते बव्हंशी गीता एक धार्मिक ग्रंथ आहे, पठनानेच केवळ आपणास पुण्य मिळेल व सद्गती लाभेल अशा भावनेने करतात त्या सामान्यव्यक्तींच्या गीता पठणात व सुभाषचंद्रांच्या गीता पठणात केवढे जा हे वरील विवेचनातून लक्षात यावे. एकूण भगवद्गीतेत स्थितप्रज्ञाची जी लक्षणे सांगितली आहेत ती सुभाषचंद्रांच्या व्यक्तिमत्वात आपणास दिसतात.

देवादिकांचे रथ अधांतरी मार्गक्रमण करतात असे आपण ऐकतो. कारण, जडजगतातील आशा आकांक्षातून ते मुक्त असतात. सुभाषचंद्रांच्या आत्म्याची तशीच मुक्त अवस्था होती. जडभूमीशी संलग्न आशा आकांक्षांचे सारे पाश तोडून त्यांचा विचार-रथ आद्यकर्तव्य व अंतिम कर्तव्य ह्यांच्या पूर्तीच्या चिंतनात भूमिस्तराच्या वर दैवी पातळीवर विहरत असे.

सन १९४१ च्या तिसऱ्या आठवड्यात एका रात्री सुभाषचंद्र बोस हे त्यांच्या कलकत्यातील राहत्या बंगल्यातून आंग्ल सत्तेच्या नजर कैदेतून जेव्हा गुप्तपणे परागंदा झाले तेव्हा भगवद्गीतेचे जे पृष्ठ त्यांनी वाचले त्या पृष्ठाशी उघडी ठेवलेली भगवद्गीतेची अनुवाद व टीपांसहित असलेली एक मोठ्या आकाराची जाडजूड प्रत त्यांच्या राहत्या खोलीत प्रदर्शित आहे. खुंट्यांवरील वस्त्रे इत्यादिही तेथे जशीच्या तशी ठेवलेली आहेत. पृथ्वीवरील स्वत:चे दिव्य कर्तव्य बजावून दिवंगत झालेल्या एका दिव्य आत्म्याच्या तेजस्वी निवासाने पावन झालेला असा बोस कुटुंबीय बंगल्यातील तो कक्ष आहे. एका स्थितप्रज्ञ आत्म्याचे निष्काम पण वीरवृत्तीचे जीवन कसे असते ते नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या चरित्रातून शिकण्यासारखे आहे.

कै. पु. ना. ओकांच्या पुण्यस्मरणाच्या दिवशी पत्नी कै. साधना ओक



(२ मार्च १९१७ - ४डिसेंबर २००७)

संस्कृत भाषेतून संभाषण, सूर्य नमस्कार वगैरे पु. ना. नी जपलेली मुल्ये कै. साधनांनी पाळली. यु एस आय एस या नवी दिल्ली ऑफिसात त्यांनी भारतीय भाषांतील मराठी, गुजराती भाषांतील प्रकाशित ग्रंथांचे मूल्यमापन करून त्याच्या २० किंवा जास्त प्रती अमेरिकेतील शैक्षणिक संस्था, वाचनालये यांना पाठवायचे काम त्यांचेकडे होते.
(स्नेह सौजन्य - सौ जयश्री वैद्य. (कन्या कै. पु. ना. ओक)